GR-200404051631148001-0100

मंत्री आस्थापनेवरील स्वीय कर्मचा-यांची वेतननिश्चिती आणि त्यांना विशेष वेतन मंजूर करण्याबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
शासन निर्णय क्र.पीओवाय-१०९९/प्रक्र ३/९९/का-२१,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक : ८ डिसेंबर,१९९९

**शासन निर्णय**

राज्य शासनाने केंद्र शासनाच्या धर्तीवर राज्य शासकीय कर्मचारी व इतर यांना वेतन, महागाई भत्ता व इतर भत्ते देण्याचा धोरणात्मक निर्णय घेतला आहे. केंद्र शासनाच्या अधिकारी/कर्मचा-यांना ज्या दराने प्रतिनियुक्ती भत्ता/विशेष वेतन अनुज्ञेय होते त्याच धर्तीवर मंत्री आस्थापनेवर प्रतिनियुक्तीवर नियुक्त करण्यात आलेल्यां अधिकारी/कर्मचा-यांना विशेष वेतन मंजूर करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन असा आदेश देत आहे की, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र.पीओवाय-१०८८/६०७५/का.२१, दिनांक २० एप्रिल,१९८९ मधील विशेष वेतनाच्या आदेशाचे अधिक्रमण करुन मंत्री/राज्यमंत्री आस्थापनेवर नियुक्त करण्यात आलेल्या स्वीय कर्मचा-यांना खालीलप्रमाणे विशेष वेतन मंजूर करण्यात येत आहे.

१) राज्य शासनाचे / स्वायत्त संस्था, महामंडळे यातील निम्न स्तरावरील पदे धारण करणारे कर्मचारी उच्च पदावर नेमण्यात आले असतील तर त्यांना त्यांच्या श्रेणी वेतना व्यतिरिक्त खालील दराने विशेष वेतन मंजूर करण्यांत यावे :-

| | विशेष वेतनाचा दर |
|---|---|
| अ) रु.८०००/- पेक्षा अधिक मूळ वेतन घेणारे अधिकारी/कर्मचारी | मूळ वेतनाच्या १२.५ टक्के परंतु कमाल रु.१०००/- दरमहा |
| ब) रु.८०००/- पर्यन्त मूळ वेतन घेणारे अधिकारी/कर्मचारी | मूळ वेतनाच्या १५ टक्के परंतु कमाल रु.१०००/- दरमहा |

२) (अ) जे अधिकारी समतुल्य आणि/किंवा सदृश्य पदावर प्रतिनियुक्तीवर पाठविले जातील त्यांचे बाबतीत त्यांच्या मूळ वेतनाच्या ५ टक्के दराने परंतु दरमहा रु.५००/- च्या मर्यादेपर्यन्त विशेष वेतन मंजूर करण्यांत यावे.

(ब) इतर सर्व प्रकरणी संबंधीत कर्मचा-यांच्या मूळ वेतनाच्या १० टक्के दराने परंतु दरमहा रु.१०००/- च्या मर्यादेपर्यन्त विशेष वेतन मंजूर करण्यांत यावे.

३) (अ) उपरोक्त क्र.(१) व (२) येथे नमूद केलेल्या दोन्ही प्रकरणी अधिकारी/कर्मचा-यांचे मूळ वेतन अधिक विहीत दराने मिळणारे विशेष वेतन यांची रक्कम अधिकारी/कर्मचा-यांच्या वेतनश्रेणीच्या कमाल मर्यादेपेक्षा अधिक होता कामा नये.

(ब) वेतन अधिक विशेष वेतन यांची रक्कम कोणत्याही परिस्थितीत दरमहा रु.२२,४००/- पेक्षा जास्त होता कामा नये.

२. हे आदेश दिनांक १ ऑगस्ट १९९७ पासून अंमलात येतील.

३. जे कर्मचारी दिनांक १/१/१९९६ रोजी प्रतिनियुक्तीवर असतील त्यांच्या बाबतीत त्यांच्या संवर्गातील वित्तलब्धीवर त्यांनी घेतलेल्या विशेष वेतनाची रक्कम सुधारित वेतनश्रेणीत १ ऑगस्ट १९९७ नंतर मिळणा-या लाभापेक्षा जास्त असल्यास फरकाची रक्कम वैयक्तिक वेतन देऊन त्यांच्या सध्याच्या प्रतिनियुक्तीच्या कालावधीसाठी संरक्षित करण्यात यावी आणि ती वेतन आणि महागाई भत्त्याच्या पुढील वाढीमध्ये समायोजित करण्यात यावी. ही सवलत दिनांक १ ऑगस्ट १९९७ किंवा त्यानंतर प्रतिनियुक्तीवर नियुक्त होणा-या कर्मचा-यांना उपलब्ध असणार नाही.

४. मंत्री आस्थापनेवरील बाहेरील उमेदवारांच्या नियुक्तीच्या बाबतीत त्यांना विशेष वेतन देय नाही. तसेच मंत्री आस्थापनेवर नियुक्त असलेल्या वाहन चालक,जमादार,चोपदार,शिपाई यांना मिळणा-या विशेष कार्य भत्त्याच्या रक्कमेत कोणताही बदल नाही. तसेच शासन निर्णय क्र.पीओवाय-१०८८/६०७५/प्रक्र २७०/८८/का-२१,दि.१९ मे,१९९० व शासन निर्णय समक्रमांक दिनांक ७ जून,१९९५ मधील मुख्यमंत्री सचिवालयाच्या व उपमुख्यमंत्री कार्यालयाच्या आस्थापनेवरील निवासी स्वीय सहाय्यक पदावरील पद धारकांना प्रतिनियुक्ती/विशेष वेतना व्यतिरिक्त मिळणा-या दरमहा रु.१००/- अतिरिक्त विशेष वेतनाच्या दरात कोणताही बदल नाही. तथापि हे अतिरिक्त विशेष वेतन आणि प्रतिनियुक्ती/विशेष वेतन मिळून होणारी एकूण रक्कम दरमहा रु.५००/- च्या मर्यादेच्या अधीन राहील.

हा शासन निर्णय,वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१०४४/एसइआर-१०, दि.१९/११/१९९९ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( दि.धों.निवरेकर )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,मुंबई,
२) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र,नागपूर,
३) महालेखापाल-१ (लेखा परीक्षा),महाराष्ट्र,मुंबई
४)महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
५)अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६)निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई,
७)राज्यपालांचे सचिव,
८)मुख्य मंत्र्यांचे सचिव
९)उप मुख्यमंत्र्यांचे सचिव
१०) सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव / मंत्रालयीन सर्व विभाग,
११) वित्त विभाग (सेवा-१०/सेवा-२/सेवा-३),
१२) सर्व विभागीय आयुक्त,
* १३) प्रबंधक, उच्च न्यायालय (मुळ शाखा),मुंबई,
*१४) प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*१५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
१६) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
१७) मुख्य लेखा परीक्षक स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
१८) उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती
१९) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१) निवड फाईल